श्री

# सुदामभाग्योदय.

हें काव्य,

कुंभकोण प्रांतांतील

तंडालम ग्रामस्थ

तंजावर महाराजाश्रित

कवि



रा. रा. कैलासवासी



रामचंद्र बावाजी गांडेकर

यांणीं रचिलें;

तें

मुंबईत

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

# श्रीमत्सुदामभाग्योदय.

---

हें पुस्तक,

श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधांतील कथाभाग

घेऊन

प्रथमात्रेय गोत्र आश्वलायनसूत्र रामचंद्र बाबाजी यांनीं महाराष्ट्र
भार्षेत गद्यपद्यात्मक रचिलें आणि श्रीकृष्णपादारविंदभ्रमराय-
माणमानस महाराष्ट्रभाषाज्ञानसंपन्न गानप्रवीण आणि
श्रीहरिकथाधुरंधर असे जे साधु महाराज त्यांस
उपायन केलें असे.

# यापुस्तकांतील गद्यपद्यसंख्येची
## अनुक्रमणिका.

# पदांची अनुक्रमणिका

# ॥ श्रीमत्सुदामभाग्योदयप्रारंभः ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

गजवदन असे जो भक्तकल्याणकर्ता । पुरवुनि सुखवी, इत्कामना विघ्नहर्ता ॥ मम मुखकमलें हा ग्रंथ निर्विघ्नतेनें । वदवुनि अतिहर्षा देव देवो दयेनें ॥ १ ॥

॥ स्रग्धरा ॥

शोभे हस्तीं जियेच्या क्वणनमधुरतायुक्त वीणाक्षमाला । ज्या देवीचा प्रसाद प्रकटुनि करितो जाणता अक्षमाला ॥ अंबा चंद्रानना जे धरि इतरकरीं अंकुशा पुस्तकातें । सुज्ञानंदप्रदा हो सुचवुनि मजला शारदा सत्पदातें ॥ २ ॥

॥ भुजंगप्रयात ॥

करी धन्य जन्मा निजानुग्रहानें । अहंकार गाळोनि संवित्प्रदानें ॥ बऱ्या दाविता सत्पथा दीनबंधु । करो जो कृपा श्रीगुरु ज्ञानसिंधु ॥ ३ ॥

॥ आर्या—गीति ॥

आर्यानंदन वाणी, सद्गुरुचरणांबुजव्रजा नमनें ॥ करितों सिद्धिप्रतिमा, ज्ञानप्राप्त्यर्थ लीयमान मनें ॥ १ ॥ तदुपरि इहपरसुखकर, हरिपदसरसिज भजेन सद्भावें ॥ चिरतरसुचरितनिकरें, यद्विषयीं मनुजचित्त लोभावें ॥ २ ॥ श्रीपतिपदपंकेरुहषट्पद जे, साधु तत्पदाब्जरजा ॥ धरितों सभक्ति शिरसा, ज्यांनीं त्यजिलें गुणा तमा हि रजा ॥ ३ ॥

॥ पद ॥ १ ॥

॥ राग हमीरकल्याण आणि धनासरी ॥ आदिताल ॥

॥ धाटी त्यागराजकृतींत ॥ मानमु लेदा ॥ तनवाडनि ॥

माधव गारे मनुजा अनुदिन मा० ॥ ध्रु० ॥ साधुजना-

वन सारसलोचन साध्वसभंजन सदय सुगुण रे ॥ अ० ॥
हरि सुखदाता हरि दुरितातें करि नृप रंका करुणास्वांतें ॥ सुर-
वर किन्नर सिद्ध ऋषीश्वर पूजिति नरवर बुधवर सारे ॥ १ ॥
इहपरसाधन इतर न ज्यासम जगीं सहसा धन जय सुख
धाम ॥ श्रीशकृपेविण सुलभ न जाण कां परचिंतन करि-
सिल शिणुन ॥ २ ॥ मुठ भर पोहे मुरमथनमुखीं मिटक्या
देउनी मैत्रीय खातां ॥ दीन कुचेला दिधला निपरुम वैभव
रामचंद्र विभूत्तम ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥

॥ शार्दूलवि० ॥

दीनोद्धारण कृष्णनाथकरुणा संपूर्ण वर्णावया । वक्ता शक्त सहस्रवक्त्र न जगीं ज्ञानी न जाणावया ॥ मी तो मानव अज्ञ होय परि ही सौभाग्यदात्री कथा । होया सर्व सुखी यथामति कथूं वर्तेन नोहे वृथा ॥ ४ ॥

॥ वसंततिलका ॥

दोषज्ञ जाणुनि गुणागुण निश्चयानें । श्लाघी स्वकीय शिरसा प्रथमास मानें ॥ कंठीं दुजें लपवि पूर्ण कृपा करोनी । जैसा महेश विभु चंद्र विषा वरोनी ॥ ५ ॥

॥ आर्या—गीति ॥

ही मम कविता कन्या, वरिली प्रेमें सुपात्ररसिकानें ॥ पाळावी स्नेहानें, विद्वज्जनपूज्य बंधुलोकानें ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ पंचचामर ॥

दिलीं अपार वैभवें दयाघनें सुधामया । कथा शुकर्षिराज ती कथी पुरा सुधामया ॥ परीक्षीति क्षितीश्वराप्रति प्रियें करोनियां । पुसे नमोनि जो स्वयें स्पृहा मनीं धरोनियां ॥ ६ ॥

॥ स्रग्धरा ॥

होता दारिद्र्यदोषें शिणत बहुपरी विप्र नामें सुदामा संसारीं

कष्ट ज्याचे अतुल हरिसखा जो भजे सौख्यधामा ॥ भिक्षान्नें काल • कंठी वसत दळकुटीमाजि भार्यासुतांसीं । कोणाही तत्कुटुंबीं पट धड न मिळे कोण देतो तयासीं ॥ ७ ॥

॥ शार्दूलवि० ॥

संध्यास्नानतपोजपादिनियमें श्रीकृष्णसंकीर्तनें । भिक्षान्नाशन सात्विक प्रकृतिनें निष्कृत्रिमें सन्मनें ॥ विप्रोत्तंस कुचेल साधु बरवीं तो ब्रह्मकर्मे करी. । ज्याचें चित्त सखेद होय बुडतां दारिद्र्यरत्नाकरीं ॥ ८ ॥

॥ मालिनी ॥

अशन वसन जेथें अश्वशृंगासमान । शिव शिव शिव कैंचा अन्य सौख्यास मान ॥ अधन विफल वानी स्वीय जन्मश्रमानें । न सुख लव जयाला वांचुनीही क्रमानें ॥ ९ ॥

## ॥ आर्या—गीति ॥

माझा काका मामा, दादा ह्मणतात लोक धनिकास ॥ संबंधलेश नसतां, धरोनियां मानसीं धनीं कास ॥ ५ ॥ विभव नसे तरि मुलगे, मेहुणचारा च करिति हो बाला ॥ वदती दायाद असें, सहोदरा आणि विसरती बाला ॥ ६ ॥ यद्यपि कृपण कुरूपी, निरक्षरी पातकी कुजाति धनी ॥ ह्मणती त्या कर्ण स्मर, वाचस्पति धन्य मान्य तूंचि जनीं ॥ ७ ॥ यद्यपि उदार सुंदर, पंडित सुचरित कुलीन दीन जनीं ॥ वदती तदितर त्यातें, रमती नर सर्व अर्थवद्धजनी ॥ ८ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

अविहित धनिकानें बोलतां होय होय । ह्मणुनि हलवितातो लोक माना सकाय ॥ अधन विहित सांगे त्यास धिक्कारितातो । करूनि अति कुतर्का पक्ष तो स्थापितातो ॥ १० ॥

## ॥ आर्या—गीति ॥

समजति उपकार मनीं, केला अपकार सर्वथा धनिकें ॥ दीनकृतोपकृतीतें, नाठविती नुमजतीच लोक निके ॥ ९ ॥ धनिककृतन्या-

याचा, न करिति उच्चार मनुज धाकांहीं ॥ आरोपितात दोषा, सह जद-रिद्रावरी वृथा कांहीं ॥ १० ॥ न कळत निरवधि सुकृतें, धनवंताचे गळां बळें पडती ॥ घर पुसत येउनीयां, धनहीना पातकें स्वयें जुडती ॥ ११ ॥ जिकडे धन तिकडे सुख, सुकृत यशो भुक्ति मुक्ति नांदतसे ॥ जिकडे दारिद्र्य वसे, तदितर तिकडे सदैव वाढतसे ॥ ॥ १२ ॥ ( येथें प्रथम पदीं चरण दुसरा इहपरसाधन इतर न ज्यासम० गावून नामसंकीर्तन करणें)

## ॥ श्लोक ॥

॥ शिखरिणी ॥

कुचेलाची कांता सुगुणनिलया सत्कुलसती । स्वधर्माचारांहीं निखिलजगतीमाजि लसती ॥ करी श्रद्धाभावें अनवरत सेवा स्वपतिची । ढळेना केंव्हांही सुदृढ मति त्या पुण्यवतिंची ॥ ११ ॥ सुदामा माध्यान्हीं प्रतिदिवस भिक्षान्न मिळवी । पुरे ना हो तें ही परि पतिस साध्वी न कळवी ॥ उगी वाढी बालांप्रति सुमति आतृप्ति पतिला । उरे तें जेवोनी मग उरवि रात्रीस विमला ॥ १२ ॥

॥ इंद्रवज्रा ॥

नाजावली साहुनि दैन्यबाधा । नाथा ह्मणे ती सुखभोग साधा ॥ आधार तो श्रीयदुनंदनाचा । आहे तुह्मां आश्रितचंदनाचा ॥ ॥ १३ ॥ ज्यांच्या असे हो नवनीत हातीं । चिंता तयां काय घृतार्थ चित्तीं ॥ त्यांहीं स्वयें यत्न परी करावा । सिद्धिप्रदाता हृदयीं धरावा ॥ १४

## ॥ पद ॥ २ ॥

॥ राग धनासरी ॥ ताळ त्रिछंदी ॥

॥ धाटी—रघुवरा परतीर पाववि रे ॥

यत्नाविना दैव कसें फळतें ॥ ध्रु० ॥ झांकूनि बसल्या वदन उगाची पोट कसें भरतें ॥ १ ॥ वेदार्थ पढल्या वांचुनि ईश्वररूप कसें कळतें ॥ २ ॥ आत्मविचारा केले नसतां चित्त कसें वळतें ॥ ३ ॥ रामचंद्र प्रभु करिल सुकारुण्या काय अज्ञांवरतें ॥ ४ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

यदुपति सुखदाता नाथ तो द्वारकेचा । अभयवरद जाणा सज्जनोद्धारकेचा ॥ निजसख ह्मणतां जा त्याकडे शीघ्र कांता । स्वकुशल कळवा जी तो हरी सर्व चिंता ॥ १५ ॥

॥ स्रग्धरा ॥

साक्षाल्लक्ष्मीवराचा प्रियसख ह्मणतां ही मला लाज वाटे । लोकीं दारिद्र्य कैंचे श्रितसुरतरु तो नायका ज्यास भेटे ॥ ज्यानें किंचित्कटाक्षें सहज निरखितां होति मेरु तृणाचे । त्या श्रीमद्वासुदेवा झडकरि कळवा कष्ट जे आपणाचे ॥ १६ ॥

## ॥ गोपीगीत ॥

॥ क्षुद्रकामदा ॥

वदुनियां असें वाक्य कामिनी । मृदुतनूलता मंजुभाषिणी ॥ निरखिते हळूं नायकानना । हरिणलोचना हास्यकानना ॥ १ ॥ तदुपरी वदे तापसोत्तम । विदितधर्म जो विप्रसत्तम ॥ परिस गोष्ट ही प्राणवल्लभे । करिं विचार तूं कांचनप्रभे ॥ २ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ मंदाक्रांता ॥

ध्याया ध्याया तिलाहि नव्हती शक्ति जों वासुदेवा । बाल्यामाजी बहु अवडली नायिके मत्कसेवा ॥ राजा झाल्यावरि मज पहा न स्मरे तो मुरारी । जावें कैसें जलजनयने म्या स्वयें त्या पुढारीं ॥ १७ ॥ कांते कृष्णा कळावें ह्मणसी कष्ट तूं कंजनेत्रि । सर्वज्ञाला अविदित असे कोणतें हेमगात्रि ॥ जागा निद्रा दिसावि कपटें जो कसा तो करावा । साध्यासाध्या विवरुनि बुधें यत्न अंगीकरावा ॥ १८ ॥

॥ शार्दूलवि० ॥

देणारा तरि तो दिलाच असता आह्मांस नोपेक्षिता । दीनोद्धारण काय दुष्कर असे लक्ष्मीवरा भूक्षिता ॥ आशेनें तुज बायकीस

तुमचे प्रारब्ध जें कां खरें । स्त्रीयाला धन मागणें परित हें भिक्षान्न माझें बरें ॥ १९ ॥

॥ दिंडी ॥

अर्थवंताची सोयरीक लोकीं, सर्व लटिकी हें अनुभवें विलोकीं ॥ भाग्यवंताचे बंधु भाग्यवंत, घरा येतां या ह्मणति राव पंत ॥ १ ॥ दीन देखोनी मान परतवीती, दानशंकेनें धरूनि मनीं भीती ॥ मागतां कांहीं त्या न याचकांनीं, बोलतां ही तें शिरेनाच कानीं ॥ २ ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

तंव निजपतिवाक्यव्याकुला पद्मपाणी । नमुनि पद करांहीं बोलिली कीरवाणी ॥ यदुपतिवरि कांहीं दोष नाहीं विचारें । क्षमवि अझुनि तुह्मां पाप जें भूत वारें ॥ २० ॥

॥ वसंततिलका ॥

प्रारब्ध दुष्ट ह्मणतां अमुचें खरें तें । प्राणेश्वरा खचित गोष्ट मनीं धरीतें ॥ नाहीं तरी हरिसुदर्शन मानना कां । जेणें सुटे दुरित दैन्य समस्त लोकां ॥ २१ ॥ ज्याची असे गरज तोचि सुनम्र व्हावा । दात्यासवें समपणा न कदा धरावा ॥ सर्वज्ञ कृष्ण भगवान् जगदंतरात्मा प्रापंचिकानुगुण दावि मनुष्यधर्मा ॥ २२ ॥

॥ उपेंद्रवज्रा ॥

नमा गड्याच्या पदपंकजातें । न मागणारा धन केवि येतें ॥ भ्रमप्रमादें भकलूं नका हो । क्रमानुसंधान करा सुखें हो ॥ २३ ॥

॥ लावणी ॥ १ ॥

॥ धाटी—नकोरे हमीर हू थांब सख्या० ॥

चला लवकरी प्रयत्नावरी परिसुनि माझी मातबरी ॥ दारिद्र्यानें फाडुनि खातां कोठुनि आली मातबरी ॥ ध्रु० ॥ कृष्णाची मेहुणी प्रसन्ना होउनि नाना विध गांजी ॥ सुटे कदा हो पाव पोटभर भिक्षान्नाची ही कांजी ॥ स्वप्नींदेखिल न देखिली हो बाळी बुगडी

संसारीं ॥ चोळ्या लुगडीं अजीर्णसीं म्या पावें केव्हां कंसारी ॥ छं०॥ या लोंबति धांदी पटीं जिवलगा हो ॥ कसि लपटूं मी या कटीं जि० ॥ मि० मान झांकणें दुष्कर झालें सुटली हुडहुड परोपरी ॥१॥ पर्णकुटींत न अटक पाउसा दिनकर हिमकर किरणास ॥ धरा त्वरेनें संपत्तिप्रद विभूत्तमाचे चरणास ॥ मृण्मयपात्राविना नसे गति पाक कराया निकेतनीं ॥ तें ही गळकें कपाळ फुटकें खोंचना कसें स्वीयमनीं ॥ छ० ॥ सुखलेश नसे लेंकरा प्रियकरा हो ॥ भलती न योजना करा प्रि० ॥ मि० दिवस उगावल्या मुलें भुकेनें सुकोनि पडती महीवरी ॥ २ ॥ सरोबरीच्या स्त्रिया नांदती संपत्तीनें सुखी जनीं ॥ करिति सोहळे नानाविध त्या हर्षभरानें दिनरजनीं ॥ लेउनियां नवरत्नभूषणें नेसुनि मोलागळ वसनें ॥ फिरती त्यांचा मंजीरध्वनि लाजवि अमुचीं सदा मनें ॥ छं० ॥ धिग्जिणें दरिद्रांचें नायका हो ॥ लोकांत निंद्य साचें ना० ॥ मि० ॥ सदैव आह्मां निरखुनि करिती हास जाणिजे निजांतरीं ॥ ३ ॥ भीक मागतां जन्म जरी हें गेलें तरि मग अनुभवणें ॥ किंवा कामित सुख सांगा जी विचार आधीं हा करणें ॥ बालजनाचे जन्मकष्ट हे दुःसह केव्हां तरि सरणें ॥ केव्हां लोकांसमोर आह्मी सभाग्य होउनि तरि फिरणें ॥छं०॥ धनधान्य कनकवसनें वल्लभा हो ॥ अतिमान्य दिव्यभवनें व० ॥ मि० कृष्ण कृपेनें लाभुनि नांदूं केव्हां आह्मी नृपापरी ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ मंदाक्रांता ॥

वाणीबाणीं ह्मणुनि पतिला या परी पद्मपाणी । पाणी आणी नयनयुगुळा ती सती दीनवाणी ॥ मानी ज्ञानी द्विज दुखवली मानिनी ही श्रमांनीं । पत्नी यत्नीं सुखविन ह्मणे पूर्ण मी वैभवांनीं ॥२४॥

॥ आर्या—गीति ॥

कवळुनि करयुगलानें कुचेल निजकामिनीस समजावी ॥ कांते चिंता न करीं, हरिकरुणेनें मनोव्यथा जावी ॥ १३ ॥ परि मी प्रयत्न करितों अदृष्ट तूझें कसें असे न कळे ॥ जरि हा सुखकाल तरी.

अमुचें कुलदैव कोमलांगि फळे ॥ १४ ॥ निश्चय हा समज जगीं, खरा जरी वासुदेव देव सति ॥ दर्शनमात्रें दयिते, आह्मां सौख्यें करोनि दे वसति ॥ १५ ॥

॥ पद ॥ ३ ॥

॥ राग तोडी ॥ आदिताळ ॥

॥ धाटी– रामरामा मनमे ब० ॥

भेटे कसा कमला पति मजला ॥ ध्रु० ॥ कमलनाभ कमलाक्ष विमल महाभाग्यवान् धरणीश दीनाला ॥ १ ॥ ज्यास्तव रानीं सुर तापस तपती ब्रह्मादिक भजतात जयाला ॥ २ ॥ परम दैन्यें चिरकाल जगतीं संसार हा करुनी शिण झाला ॥ ३ ॥ कामपिता तो कमनीयतनू श्रीरामचंद्र प्रभु या पतिताला ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ शार्दूलवि० ॥

नेती कोण नृपालकाजवळ या दारिद्र्यदुःखाकुला । जातां दाट चळें भटावळि कसी सोडील दैवा मला ॥ वीराग्रेसर राखितील हरिच्या वाड्यापुढें निश्चयें । जावें केविं धजोनि सांग तिकडे आज्ञेविना निर्भयें ॥ २५ ॥

॥ इंद्रवज्रा ॥

कांहीं असो जाउनियां पहातों । अयत्न मी त्यावरि शीघ्र येतों ॥ कांते वसावें घरिं जाग्रतेनें । होऊं सुखी श्रीहरिच्या कृपेनें ॥ २६ ॥

॥ शार्दूलवि० ॥

न्याया काय असे घरीं वद सखे श्रीकृष्णसंदर्शना । जेणें होय विभुप्रहर्ष बरवी आह्मांस संभावना ॥ नाथा सुंदरसी मनोज्ञ वसते ही वालरत्नावाळी । घालाया हरिच्या गळां त्वरित न्या तन्मानसातें बळी ॥ २७ ॥

॥ आर्या—गीति ॥

जावें न रिक्तहस्तें, प्रभुगुरुनृपदेवदर्शना ललने ॥ भावें द्यावें कांहीं, सकलहि तो एक कृष्ण मृगनयनें ॥ १६ ॥

## पद ॥ ४ ॥

॥ राग कापी ॥ त्रिपुट ताळ ॥

॥ धाटी—बांग पोगलि यदुप नछिगे यनुको० ॥

केंवि जाईन कृष्णसन्निध काय देइन त्याप्रति ॥ प० ॥ देवकीसुत दे सुखें क्षितिदेव मी अनुपायन ॥ अ० ॥ वल्लभे घरिं विभुस कांहीं न फुल्लसारसलोचने ॥ अल्पदानें हर्षतो अहितल्प आश्रितचंदन ॥ १ ॥ बहुदिसांवरि बाल्यमित्र मी पाहुं जाय तरी हरी ॥ बाहुजेश्वर वदल कीं दे कांहिं जें मज आणिलें ॥ २ ॥ वारिजाक्ष अपारवैभव द्वारकापुरपालक ॥ सारसोद्भवसंभृतांघ्रि क्षीरसिंधुसुतावर ॥ ३ ॥ सोमवंशज श्यामसुंदर नामकीर्तन तष्ट जो ॥ कामजनक कामपूरक रामचंद्र विभूकडे ॥ ४ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ मंदाक्रांत ॥

कांहीं बाहीं सुमुखि भवनीं सांपडे नीट पाहीं । नाहीं नाहीं ह्मणसि समयीं लौकरी आण कांहीं ॥ चिंताक्रांता परिसुनि असें वाक्य ते विप्रकांता । अंतःप्रांता हुडकुनि वदे आणि पूर्या निशांता ॥ २८ ॥

॥ वसंतति० ॥

जे जे पदार्थ सहसा न मिळेत कांता । स्वप्नींहि कृष्णनगरीं हुडकूं पहातां ॥ ते सर्वही स्वसदनीं भरलेत आतां । जे पाहिजेत ह्मणि-न्या मग काय चिंता ॥ २९ ॥

॥ पृथ्वी ॥

बरें परतलें प्रिये वय तुला पुरे मस्करी । पुरेल निजकामना ह्मडकरीं जसी तूं करी ॥ घरांत नसलें तरी सुसमयीं तटे कार्य कां । शिणोनि उसणें तरी मिळविती जगीं बायका ॥ ३० ॥

॥ द्रुतविलंबित ॥

परिसतां पतिवाक्य निघे सती । त्वरित जाय सखीसदनाप्रति ॥ मनिं ह्मणे उसणें पण मागणें । परम दीन जनास असे उणें ॥३१॥ निरखितां अधना भय वानिती । प्रथम तो न तयासह बोलती ॥ कि-

गटुनी ऋण त्यांप्रति मागतां करिति कार्यविचार न भागतां ॥ ॥ ३२ ॥ करुनि चिंतन हें स्वसखीस ती । हुडकितां सदनीं नि-रखी सती ॥ कळवि कामित तीप्रति कामिनी । चुकुर होउनियां द्विजभामिनी ॥ ३३ ॥

॥ आर्या—गीति ॥

जाणुनि समय तिनें मग, दिधलें ईच्या करांत पृथुकांतें ॥ त्यांविण तीच्या सदनीं, नव्हतें ह्मणवोनि अन्य निजहातें ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

लगबग ललना ते धांवली घेउनीयां । पृथुक पतिकडे तैं मोदिता होउनीयां ॥ गडिन मज दिली हो ही ह्मणे दिव्य पोहे । द्विज नि-रखुनि तीतें हर्षसिंधूंत पोहे ॥ ३६ ॥

॥ मंदाक्रांता ॥

बांधावे म्यां वद सुवचने हे कशामाजि पोहे । न्याया हातीं नलिननयने सर्वथा योग्य नोहे ॥ ऐसा बोले द्विज तंव तिनें आ-णिली एक चिंधी । धांदी तीच्या लपटुनि करें तीव्र तीमाजि बांधी ॥ ३७ ॥

॥ आर्या—गीति ॥

गांठोडी पृथुकांची, घेउनियां शीघ्र विप्र बगलेस ॥ येतों जावोन ह्मणे, आतां मी द्वारकेस विमलेस ॥ १८ ॥ मंगलकारक माधव, संगमसाम्राज्यलाभ पतिला हो ॥ तुंगपदीं बसवो सुर, पुंगव साध्वी ह्मणे स्वसुख लाहो ॥ १९ ॥

पद ॥ ९ ॥

॥ राग कानडा ॥ आदिताळ ॥

॥ धाटी-सुखीयवरो रामनाम सु० ॥

कुशल करो कंजनाभ ॥ ध्रु० ॥ शशधरमौळिसुहृद हरि दशमुखादि खलदानववैरी ॥ अ० ॥ भक्तजनावन भवविमो-

चन मुक्तिसौख्यप्रद मुरहरशौरी ॥ पक्षीवाहन पन्नगशयन रक्षित भुवन ॥ रामचंद्र प्रभु ॥ १ ॥

॥ दिंडी ॥

द्वारकेचा तो धरुनि मार्ग चाले, तया निघतांची भव्य शकुन झाले ॥ वामभागीं पैं उभय गरुड गेले, विप्र दोघे त्यापुढें पूज्य आले ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

घण घण घण घंटा वाजल्या देवळाच्या । दण दण दण तोफा ऐकिल्या उत्सवाच्या ॥ सजलकलश योषा पातली सव्य आयी । ह्मणत मम शिशो मी मागसी तेंचि देयीं ॥ ३६ ॥ द्विज निरखित चाले एकटा शूद्र आला । तदुपरि उजवा त्या चांगला काक झाला ॥ मग लगबग धांवे वामभागीं कुरंगी । शुकपिकमुख पक्षी कूजती पंचरंगी ॥ ३७ ॥

॥ आर्या—गीति ॥

भारद्वाज द्विजही, द्विज निरखी धांवतां स्वनयनांहीं ॥ डावेकडे तदा तो, हर्षे अत्यंत दिव्यशकुनांहीं ॥ २० ॥

॥ श्लोक ॥

॥ वसंतति० ॥

होती मला शकुन चांग परोपरीचे । होईन पात्र सुकृपेस ह्मणे हरीचे ॥ हे भासती कुशलसूचक रम्य साचे । वांछेस पूर्ण करिती मम मानसाचे ॥ ३८ ॥

॥ आर्या—गीति ॥

कृष्णध्यानपरायण तद्गुणगण, गात चालिला भावें ॥ ज्याचें कामित हें कीं, हरिदर्शनसौख्य शीघ्र लाभावें ॥ २१ ॥ नग नद कासार नद्या, तरुसंचय विविध निरखिले वाटे ॥ नानाविहग मृगें

ही, पथ दुर्गम सान त्या द्विजा वाटे ॥ २२ ॥ कृष्णामृततृप्ताला, बाधी कां क्षुत्तृषार्ति विप्राला ॥ काय करील खगेश्वर, रिपुधर्मे विष्णुतल्पभुजगाला ॥ २३ ॥

॥ पद ॥ ६ ॥

॥ राग यमुनाकल्याणी ॥ ताल रूपक ॥

॥ नारायण नारायणा जयगो पा० ॥

राधापति राधापति राजीवाक्ष हरे ॥ ध्रु० ॥ धृतकौस्तुभवनमाला दर्शितबहुविधलीला ॥ गोपालकवरबाला कल्पितकपटसुजाला ॥ १ ॥ तिलकसुशोभितफाला धृतकांचनमयचेला ॥ खगवाहन घननीला गेयसुगुणगणशीला ॥ २ ॥ नवपल्लवनिभचरणा नलिनोद्भवमुखशरणा ॥ मंदरशैलोद्धरणा करूणापूरितनयना ॥ ३ ॥ आश्रितजनमंदारा गोकुळनगरविहारा ॥ देवा धीरोदारा दर्शन दे सुकुमारा ॥ ४ ॥ ( एथें नामसंकीर्तन करणें ॥)

॥ दिंडी ॥

असा लागे हो ध्यास माधवाचा, पथीं गर्जे श्रीकृष्णनाम वाचा ॥ मार्ग लंघोनी द्वारकापुराचा, निकट आला तो विप्र शीघ्र साचा ॥ ४ ॥

॥ गोपीगीत ॥

॥ शुद्धकामदा ॥

देखिलीं तदा रम्य काननें । वर्णितो तया कोण आननें ॥ नंदनापरी भासती खरीं । हर्षला बरा विप्र अंतरीं ॥ ३ ॥ ऋतु समग्र ही राहती सदा । उपवनीं उणें काय त्या सदा ॥ पथिक तो श्रमा विस्मरे तदा । निरखुनी वना प्राणिहर्षदा ॥ ४ ॥

॥ सवाई ॥

॥ मदिरा ॥

शोभति साल महोन्नत ताल पलाश विशाल कपित्थ रसाळ । आणि तमाला वटामलकादिक पुष्पफलान्वित जंबु रसाळ ॥ दा-

डिम बिल्व लवंग शमी कदळी लिकुचादिक निस्तुल साल ॥ पाहत पाहत चालतसे द्विज आणिक उत्तम चांगट वेल ॥ १ ॥

॥ श्लोक ॥

॥ शार्दूलवि० ॥

द्राक्षांचे घड लोंबती तरुलता फांपावल्या साजती । खर्जूरादिक घोंस घोंस लवती जे मानसाकर्षिती ॥ वेळाचे मृदु वेल तों उपवनीं पुष्पीं फलीं दाटले । सारे वृक्ष तसेचि अन्य बरवे नानापरी शोभले ॥ ३९ ॥

॥ आर्या—गीति ॥

करवीर कुंद चंपक, सुंदर मंदार केतकी जाजी ॥ शोभे वासंती त्या, वनांत नवमल्लिकादि सुमराजी ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

घुमुघुमित बरा ये वास साऱ्या सुमांचा । जुंयिजुंयि विपिनीं त्या नाद इंदिंदिरांचा ॥ झुळुझुळु जल वाहे मध्यमध्यें झऱ्यानें । हळुंहळुं झडती त्यामाजि पुष्पें क्रमानें ॥ ४० ॥

॥ पृथ्वी ॥

पराग सलिलावरी पसरुनी तया झांकिती । तयांत कुसुमावळी अलिगणासवें वाहती ॥ हळूंहळुं जलामधें जलजबालही पोहती । तदा उभयकांठसीं लघु तरंग हेलावती ॥ ४१ ॥ पयोमधुरता स्वयेंच बरवी असे त्यावरी । गळोनि मकरंदही मिसळतां चढे ती बरी ॥ प्रसूनतति लाविती सरस आपुला वास त्या । कुचेल निरखोनियां नवल वानि त्या वाहत्या ॥ ४२ ॥

॥ मणिगुणनिकर ॥

नवसरसिजततिसहित कमलिनी । ऋतु पद वन कारि सरस कुमुदिनी ॥ कमलजरथखग वसति विरमुनी । प्रियकर ह्मणउनि फिरति सुर मुनि ॥ ४३ ॥

॥ सवाई ॥

॥ मदिरा ॥

सारस कोक चकोर मयूर सदार विहार सुखें करिताती । नाचति कूजति साजति भूवरि आणि तरूवरिही उडताती ॥ घालिति लाख कित्येक नभीं क्षण ठाकुनि भोंवति खेळति पक्षी । मानुनि कौतुक केवळ तो द्विज विस्मित होउनियां तंव लक्षी ॥ २ ॥

॥ श्लोक ॥

॥ शार्दूलवि० ॥

गातीं कृष्णगुणौघ सुस्वरभरें कांतासवें कोकिला । प्रेमानें शुक-शारिका सततही तो विप्र तें ऐकिला ॥ वानावें किति म्यां ह्मणे नवल हीं भाग्याथिलीं पांखरें । यांचें केवल धन्यधन्यचि जिणें लोकीं असे हो खरें ॥ ४४ ॥

॥ पद ॥ ७ ॥

॥ शुकशारिकाकोकिलगायन ॥

॥ राग अनेक ॥ रूपकताळ ॥

॥ धाटी–सुजनजीवना सुगुणभूषणा ॥

मदनमोहना मधुविदारणा ॥ कृष्णा ॥ ध्रु० ॥ मुदितसज्जना कृतमुरविनाशना ॥ उदितारुणचरणांबुज उरगमर्दना ॥ कृष्णा अ० ॥ कोमलांग मेघनील गोपालबाला ॥ सोमोपमानन सुशील सुरनुतलीला ॥ काम्यमोक्षदायक कल्पपादपा रम्यकुटिलमृदुकुंतळ ॥ रामचंद्ररंजना ॥ १ ॥

॥ श्लोक ॥

॥ वसंततिलका ॥

नोहेत हे खग विहंगमवेषधारी । गंधर्व किन्नर मुनीश्वर दानवारी ॥ नाहींतरीं सुभगवल्लवजनानुरक्ति । कोठोनि यांस घडली असमान भक्ति ॥ ४५ ॥

॥ मालिनी ॥

भुजग नकुल तेथें फार अन्योन्यभावें । वसति विसरूनीयां वैर

साधुस्वभावें ॥ मृगपतिसह सारीं सावजें खेळताती । अघटित घटना ही ईश्वराज्ञेत होती ॥ ४६ ॥

॥ सवायी ॥

॥ अमृतध्वनि ॥

कंठीरवाश्वकरिशार्दूलघृष्टितति संचार फार करिती । गायी गुरें हरिण त्याही कदापि भय नाहीं मनांत धरिती ॥ सेवोनियां सुतृण पीवोनियां सलिल होवोनि तृप्त रमती । सारीं मृगें वनविहारी असीं तरूलतेला कदा न शिवती ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥

॥ भुजंगप्रयात ॥

नदी देखिली चांगली त्या द्विजानें । दुजी जान्हवी वानिली तीच ज्यानें ॥ जियेमाजि पंकेरुहादि प्रसूनें । बरीं साजती षट्पदांहीं नवीनें ॥ ४७ ॥

॥ आर्या—गीति ॥

तत्तटमनोज्ञतेनें, मोहुनियां विप्र तो उभा राही ॥ नानाजातीय असे, लवती तरु सुफलपुष्पभारांहीं ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

सलिल विमल ऐसें त्या नदीमाजि नोहे । विहग मृग सुखानें सेवितां विप्र पाहे ॥ कुशकुसुमभरानें दाटले कांठ दोनी । धवलित लसती हो रम्यसे भूरुहांनीं ॥ ४८ ॥ स्फटिकमणिगणांच्या रम्य सोपान-पंक्ती । तटघटित अशा त्या पैल जाऊं न देती ॥ कनक-रजतशाला शोभती हो विशाला । पथिकशिण हराया अन्य वांछा कशाला ॥ ४९ ॥

॥ वंशस्थ ॥

नदीतटाची रमणीयता असी । तदीयचित्ता सुखवी बरीतसी ॥ करावया तो स्नपनादिका तदा । कुचेल गुंते धरुनी मनीं मुदा ॥५०॥

॥ भुजंगप्रयात ॥

करि स्नानसंध्यादिक ब्रह्मकर्मा । हरिध्यानसंयुक्त तो युक्तधर्मा ॥ बरा मानसीं कृष्ण पूजी नमोनी । वनीं देखिल्या तोयपुष्पीं फलांनीं ॥ ९१ ॥

॥ आर्या—गीति ॥

त्यावरि निघतां विप्रें, तुळसीवन देखिलें मनोहरसें ॥ कृष्णार्पण करि त्यातें, नाहुनि भगवत्पदाब्ज मोहरसें ॥ २६ ॥

॥ श्लोक ॥

॥ शार्दूलवि० ॥

चाले पैल कुचेल तीव्रगतिनें तों देखिली द्वारका । विद्युत्पुंजसमान जी झळकली ती सज्जनोद्धारका ॥ जीचीं कांचनगोपुरें सशिखरें प्रद्योतनस्यंदना । व्योमार्गीं हटकोनि कीं तटविती हें आढळे लोचना ॥ ९२ ॥

॥ मालिनी ॥

द्विजवर नगराच्या गोपुरा हात जोडी । हरि हरि हरि ऐसें नाम वाचे न सोडी ॥ नमन तुज ह्मणे श्रीकृष्ण कंजायताक्षा । श्रितजनसुरवृक्षा श्रीपते सत्कटाक्षा ॥ ९३ ॥ द्विज हळुंहळुं आला गोपुरद्वारदेशा । निरखित मणिशाला ध्यात तो इंदिरेशा ॥ सलिलभरित ऐशा भोंवत्या खंदकातें । कनकरजतकॢप्ता शृंखलाबंधकातें ॥९४॥

॥ आर्या—गीति ॥

तदुपरि कुचेलनामा, द्विजोत्तम द्वारकेंत शिरला हो ॥ पाहे नगरातिशया, तेणें त्या कां न हर्षभर लाहो ॥ २७ ॥

॥ लावणी ॥ २ ॥

॥ धाटी—इंदुवदन मीनचक्षु तळपती ॥

सुंदरसी दिक्कुमुदकौमुदी कुबेरनगरापरी ॥ देखिली बरी द्वारकापुरी ध्रु० ॥ पुष्पराग गोमेदहिऱ्याचे मरकत मुक्तामणि ॥ गणाचे साल लसति कोंदणी ॥ मधेंमधें बहु बुरुज साजती रंगदार नवख-

णी ॥ शारिकाशुकपिकपक्षीगणी ॥ अलंगावरी तोफ सजविले चांगट यंत्री जनीं ॥ चतुर जे केवळ समरांगणीं ॥ छं० ॥ रणकर्कश ऐसे थोर शिपायी फार ॥ करिं खड्ग घेऊनी फिरती जोरावार ॥ धरि दाट सावली ज्यांवर तरुचा वार ॥ मि० ॥ रक्षिति लक्षावधि सेनेसह पुरद्वार यापरी ॥ दे० ॥ १ ॥ राजबिदी अतिविशाल निर्मल अशा फार साजती ॥ जयांचीं घरें गगन बोलती सातपांचनवखणी माहड्या रत्नखचित झळकती ॥ कवाडे अरशांचीं शोभती ॥ कोसकोसभर सदनपंक्ति स्या सरळ फार विलसती ॥ जनांची लोचनार्ति निववितो ॥ छं० ॥ प्रतिगृहीं वाजती वीणा ताल मृदंग ॥ परिसोनि बिदीचे होती हो जन दंग ॥ आबालवृद्ध पैं गाती हो श्रीरंग ॥ मि० ॥ जिकडेतिकडे नाच रंग बहुसरस होय यापरी ॥ दे० ॥ २ ॥ बिदीमधें स्या सदैव सुंदर नरनारी वागती ॥ मुखीं श्रीकृष्णनाम गर्जती ॥ सुर किन्नर गंधर्व अप्सरा असे पौर भासती ॥ जयांचे लावण्यास न मिती ॥ जिकडेतिकडे दिसति कूप सर रुंद रुंद वाहती ॥ कालवे नद्या याद पोहती ॥ छं० ॥ द्विज सारे करिती तेथें संध्यास्नान ॥ गज घोटक गायींचे थर शंबरपान ॥ जप पूजन कोणी करितातो श्रुतिगान ॥ मि० ॥ त्यक्तभीति जन सर्व नांदती पुण्यवती भूवरी ॥ दे० ॥ ३ ॥ नृपभवनाचे विभववर्णनीं शेष मूक जाहला ॥ जयाची निरुपम लक्ष्मीकला ॥ स्वर्णरौप्यनवरत्नकोश तो केवळ उंचावला ॥ ज्यापुढें धनदाचा लाजला ॥ अगणित पशु गज हय रथ शिबिका अंबाऱ्या चांगल्या ॥ तशाची हौद्यांच्या तति भल्या ॥ छं० ॥ यद्द्वारीं राखिति विधिमुख सुरमुनिजाल ॥ वैकुंठ किंवा कैलास गमे तेजाळ ॥ जीमाजि नांदतो कृष्ण त्रिभुवनपाल ॥मि०॥ रामचंद्र विभु राजधानि ती रम्याकृति यापरीं ॥दे०॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ शिखरिणी ॥

हजारीचे दारा निरखित पुराश्चर्य बरवें ॥ सुदामा आला जें बहुत भरलें वाद्य सुरवें ॥ तया माजी कोणी नटविति तुरंगा फिरविति । महा चातुर्यानें विधविध जयांच्या द्रुतगति ॥ ९९ ॥ गजा फेरे घेतों

बसविति विनोदें गजपति । रणाभ्यासी एकावरि वरिवरी अन्य ट-पती ॥ रथा वोढूं अश्वद्विरदवृषभांतें शिकविती । शिपायांचे नाना थर समरमार्गांत रमती ॥ ५६ ॥

॥ आर्या—गीति ॥

सोन्नतविशालकांचन, रत्नप्रासादभेदपरिवारा ॥ श्रीकृष्णराज-धानी, जींत न गणना तुरंगगजवारा ॥ २८ ॥ निरूपम विभव हरीचा, निरखित विप्र प्रवेशला साचा ॥ सौधांतरीं क्रमेण, प्रिय-तम जो श्रीजगन्निवासाचा ॥ २९ ॥ आला बंकाजवळी, लंघु-नियां तो महाल बाराही ॥ तेथें हटकिति त्यातें, जासी निःशंक कोण बा राही ॥ ३० ॥

॥ पद ॥ ८ ॥

॥ राग शंकराभरण ॥ आदिताळ ॥

॥ धाटी–यार म्या वड हारवानीने० ॥

कोणरे कंगाल तूं कोठें जासी ठाक ॥ कोणातेंहि न पुसोनि कैसा दडदड धांवसि ठीक ॥ ध्रु० ॥ आज्ञेवांचोनी आंतिल नृप-भवनीं ॥ जाउं नेदूं गलीत दंडूं जाणुनि धरि मनिं धाक ॥ १ ॥ दि-ससी केवळ भ्याडहि खेडाळ ॥ वाड्यामाजी करिसी चाल तूं हीं नर सा एक ॥ २ काय रे तुज काम सांग रे तव नाम ॥ कोठुन येसी कोठें धाम कवणाचा तूं लेंक ॥ ३ ॥ मीपण सोडोनी रत जो हरिभजनीं ॥ रामचंद्र प्रभुवर देइल दर्शन त्या निःशंक ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥

॥ स्रग्धरा ॥

श्रीकृष्णाचा ह्मणे तो प्रियतम बरवा मित्र मी होय साचा । आलों संदर्शनार्थ स्वकुशल कळवूं काम हा मानसाचा ॥ नामाचा मी सुदामा त्वरित कळउनी शौरिचे सन्निधानीं । न्यावें तुह्मींच मातें कळवळुनि मनीं साधु ऐशा बुधांनीं ॥ ५७ ॥ ही वाणी ऐकतां ते खदखद अवघे हांसले द्वारपाल । कोठें संपादिला कीं, ह्मणति समगडी आमुचा हा कपाळ ॥ पुण्या तों पार नाहीं यदुकुलपतिच्या

कृष्ण हा लोकपाळ । वेडा झालाचि जाणों नवल नवल हें काय याचें कपाळ ॥ ५८ ॥

॥ आर्या—गीति ॥

राजाज्ञा ही आहे, कळवावें अचुक भूसुरागमना ॥ चुकल्या अपराध घडे, प्रभुच्या येईल सत्य राग मना ॥ ३१ ॥ यास्तव जावोनि तदा, वंदुनि साष्टांग कळविती हरिला ॥ ज्यानें निजभक्तांचा, पदेपदे संकटौघ परिहरिला ॥ ३२ ॥

पद ॥ ९ ॥

॥ राग ब्याहाग ॥ आदिताल ॥

॥ धाटो—भजा भक्त वत्सल तो० ॥

महाराजराज श्रीमंत जी जी ॥ म०॥ ध्रु० ॥ आला सुदामा ठेला रिकामा ॥ बंकामाजी ॥ १ ॥ दिसे दीनसारिखा ह्मणे आपुला सखा ॥ स्वामी परिसा जी ॥ २ ॥ गमे उपवासी तो दांत वासी ॥ ब्राह्मण जी जी ॥ ३ ॥ रामचंद्रप्रभु नाम मुखीं सदा ॥ गातो जी जी ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

यदुपति परिसे तों स्वीयमित्रोदयाला । परमहरिख झाला अंतरीं त्या दयाळा ॥ अहह विसरलों मी बंधु ऐसें वदोनी । अनय ह्मणुनि गाला लाविले हात दोनी ॥ ५९ ॥

॥ वसंतति० ॥

सिंहासनावरुनि देव उडीस टाकी । धांवे तसाचि जन कौतुक हें विलोकी ॥ राधा पुसे तंव पलायनकारणातें । दाटोनियां सकलदानवदारणातें ॥ ६० ॥

॥ मालिनी ॥

नवल नवल कृष्णा काय झालें पळाया । प्रबळ कवण आला सांग तूतें वळाया ॥ अजुनि दहिंदुधाची मांडिली काय चोरी । धरुनि परगृहींच्या वोढिल्या काय पोरी ॥ ६१ ॥ मकर करिवरातें

पातला कीं गिळाया । कुरुपति रिघला कीं द्रौपदीतें छळाया ॥ सुटुनि जयरथाचे काय घोडे पळाले । चपलतर दिगंतीं वल्लभा वेगळाले ॥ ६२ ॥

॥ आर्या—गीति ॥

वदला वनितेप्रति तो, भक्तपराधीन लोकपाल हरी ॥ दीनोद्धारण रत जे, यद्धृदयीं दाटली कृपालहरी ॥ ३३ ॥

पद ॥ १० ॥

॥ राग खमाच ॥ आदिताळ ॥

॥ धाटी-आलि मैं तो अब तो भैरागीन भै० ॥

देव ठेला दयिते दारीं येउनी ॥ ध्रु० ॥ पुण्य फळालें पहा प्रिये आजी ॥ बहुदिसां श्रीधरणी ॥ १ ॥ निरखूं ज्यातें नयनें भुकेलीं ॥ समज तो प्राणधणी ॥ २ ॥ आगमनानें महानुभावाचे ॥ सुदिन हा वो रमणि ॥ ३ ॥ रामचंद्रप्रभु सखा जगामाजी ॥ प्रथम जो पूज्य जनीं ॥ ४ ॥

॥ आर्या—गीति ॥

परिसुनि हरिवचनातें, सुविस्मिता राधिकादिका रामा ॥ पुसती पुनरपि त्यातें, अद्भुत हें वदसि सद्गुणारामा ॥ ३४ ॥ त्रिजगन्नाथा तुजला, आला कोठोनि देव सांगावा ॥ नेणूं तुजविण लोकीं, सर्वांनीं जो तमींदिसां गावा ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥

॥ वसंतति० ॥

पाहूं चला सकलही मम दैवतातें । ऐसा वदे विभु तदा वनिताजनातें ॥ आला तयांसहित आपण भूपरंका । पाहे उभा द्विजवरिष्ठ विशिष्ट रंका ॥ ६३ ॥

॥ पद ॥ ११ ॥

॥ राग नादनामक्रिया ॥ आदिताल ॥

॥ धाटी-काय केलें रे नरजन्मा येउनी ॥ काय के० ॥

देखिला दारीं देवें सुदामा ॥ दे० ध्रु० ॥ मुखीं जयाच्या मुरहर

नामें ॥ सुखी नांदती सदा हीं वरीं ॥ १ ॥ श्रीतुळसीमणिमाला कंठीं ॥ आणि जपाची साजतां करीं ॥ २ ॥ त्रितापशोषित कृश तनु ज्याची नटे दीनता मुखोत्म्यावरी ॥ ३ ॥ कामपूर्तिकर करुणापांगें ॥ रामचंद्र विभुवरें झडकरी ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ वसंततिलका ॥

आनंदबाष्पमकरंदझरी प्रवाहे । गोविंदनेत्रकमलाहुनि लोक पाहे॥ पीतांबरें कसुनि माज कृपालवालें । साष्टांग वंदन सुदामपदास केलें ॥ ६४ ॥ ब्रह्मादिकां चुकविता प्रभु जो अपायीं । कृष्णोऽस्मि हें वदुनि वंदित विप्रपायीं ॥ दोहीं करीं उचलुनी द्विज माधवाला । वक्षस्थळीं कवळिला करुणालवाला ॥ ६५ ॥

॥ गोपीगीत ॥

॥ शुद्धकामदा ॥

कवळिली सुखें कृष्णमाउली । निववि ती श्रमा नित्य साउली ॥ मृदु तनू लतामूर्ति सांवळी । हुडकिती जिला तापसावळी ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

हृदयकमलवासी कृष्ण बाहेर आला । गमत बुधजनाला विप्र हा देव ज्याला ॥ तंव मुनिवरभाग्या पाहती कौतुकानें । उभयकुशल वार्ता ऐकती लोक कानें ॥ ६६ ॥

॥ वसंततिलका ॥

देवाधिदेव हरि दे कर लाघवातें । दादा असें वदत सत्पथवैभवातें ॥ सौधांतरीं त्वरित नेउनि आदरानें । भद्रासनीं बसविला कमलावरानें ॥ ६७ ॥

॥ आर्या—गीति ॥

नवरत्नांचे ताटीं, धूतो हरि भूमिदेवपदकमला ॥ देवाधिदेव भावें, घाली हो सलिल रुक्मिणी कमला ॥ ३६ ॥ अर्घ्याचमनाद्यांहीं, पूजी

प्रभु आदरोपचारांहीं ॥ घालवि राज्ञीहस्तें, मार्गीं श्रमला ह्मणोनि वारा ही ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥

॥ शार्दूलवि० ॥

आनंदें भरला कुचेल फुगला अत्यंत कृष्णादरें । जन्माचे श्रम सर्वही विसरला तात्काल दामोदरें ॥ ज्याचे हृत्कमलेक्षणांतुनि सुटे प्रेमाश्रुधारावळी । झालों मी बहु भाग्यवान् ह्मणतसे चिन्मूर्ति ही पावली ॥ ६८ ॥

॥ पद ॥ १२ ॥

॥ राग कांबोदी ॥ आदिताल ॥

॥ धाटी–अरे मी भीष्म जरी श्रीहरी ध० ॥

झालों धन्य जगीं आजि मी तुज निरखोनि हरी ॥ ध्रु० ॥ दीन दयाला सुरपरिपाला ॥ घननीला विमला श्रीपति शौरी स्वामी मुरारी संतुष्टलों अंतरीं ॥ १ ॥ बहुदिवसांचें तपफल साचें ॥ मज लाभलें यापरी ॥ श्रीवनमाली निपट निमाली मम नयनार्ति बरी आ० ॥ २ ॥ अतिशय विभवीं रतिपतिजनका ॥ निरुपम सौधांतरीं रामचंद्र प्रभो राजपदीं महाराज्ञीजनाभीतरीं अ० ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥

॥ अनुष्टुप ॥

जय वैकुंठभवना । जयवृंदारकावना ॥ जय दुग्धाब्धिशयना । जय राजीवलोचना ॥ १ ॥

॥ दंडक ॥

जयजलरुहनाभ पद्मामुखांभोजभृंगायमानेक्षणद्वंद्वशोभायमानाननाब्जप्रभामोहितानंगहृत्पंकजा । वैनतेयध्वजा । अच्युताधोक्षजा । शंखचक्रादिशोभा लसद्बाहुयुग्मद्वया । अद्वया । चारुपीतांबरालंकृतेंदीवरस्तोमसंकाशकायप्रभाशोभिता । वासवादिस्तुता । कोटिकंदर्पजालान्विता । योगिहृत्पूजिता । शेषशय्यासुखानंदितस्वांतलक्ष्मीतनूकल्पवल्लीलसद्देहवृंदारकक्ष्मारुहा । सर्वसौख्यावहा । कोटिमार्तंडतुल्योज्ज्वलत्कौस्तुभश्रीविभूषाविशेषाश्रयागारविस्तारवक्षःस्थला । दैत्यजिन्निस्तुला । विधिमुखसुर-

मस्तकन्यस्तनागेंद्ररत्नोज्ज्वलच्छीकिरीटालिनीराजितांघ्रयंबुजातप्रभावोन्नता । त्वदृष्टपादानता । मत्स्यकूर्मादिदिव्यरूपविध्वंसितादित्यदस्युव्रजा । देवकीगर्भजानंदकांतायशोदातपोराशिसंलब्धबालस्वभावान्विताशेषलीलायुता । गोपकांतारता शकटदनुजपूतनाभंजना । कंससंमर्दना । अभिनवदुग्धादिचौर्यप्रवीण प्रभो जारचूडामणे भक्तचिंतामणे वेणुगानस्वनानंदिताशेषगोगोपगंधर्वरंभादिकस्वर्गवारांगनावारत्दत्पुष्करा । गोपिकातस्करा । गोकुलानंदसंवर्धका । यादवस्तोमसंरक्षका । पांडुसूनुप्रिया । चंद्रवंशाब्धिचंद्रोदया । देव गोवर्धनोद्धारका । द्वारकापालका । रुक्मिणीसत्यभामादिकानायका । सर्वदेवेशयक्षेशनाकेशसंकाशसद्वैभवानंदितस्वांतपंकेरुहा । दुष्टसन्निग्रहानुग्रहा । अष्टलक्ष्मीश्वरश्रीमहाराज राजाधिराज प्रभो कृष्ण विष्णो हरे पाहि मां पाहि मां पाहि माम् ॥ १ ॥

॥ आर्या—गीति ॥

सुरसार्वभौम तेव्हां, परिसुनि ऐशापरी निजस्तवना ॥ तापत्रयतमाखरि, शिपित वदला कृपाप्रशस्त-वना ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

बहुत दिवस झाले क्षेम तूझा कळेना । असति तुज किती रे लेंकरें आढळेना ॥ वससि कवण ठायीं काय संपत्ति आहे । कथिं सकल गड्या तूं ज्यामुळें हर्ष लाहे ॥ ६९ ॥ बहुत दिवस केली त्वां गड्या कां उपेक्षा । मम मनिं बहु होती दर्शनाची अपेक्षा ॥ सुदिन पुरविली त्वां आजि दादा कृपेनें । परम मुदित झालों धन्य या वैभवानें ॥ ७० ॥

॥ आर्या—गीति ॥

भगवद्वचन परिसतां, थक्कित झाला वसुंधरासुर तो ॥ वदला चिंतुनि ऐसें, मित्रप्रेमांत मुरहरासु रतो ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥

॥ शार्दूलवि० ॥

देवा नेणसि साच काय पुससी हे सर्वलोकेश्वरा । विश्वव्यापक

तूं असोनि सखया सर्वज्ञ पद्मावरा ॥ दावावा तुज काय दीप धरणी-कांता जगच्चक्षुला । आज्ञाधारक मी परंतु कथितों वृत्तांत सारा तुला ॥ ७१ ॥ त्वन्नामामृततृप्त मी यदुपते त्वद्ध्यानकौतूहली । त्वत्पादांबुजपूजनोत्सवसुखी त्वन्मंत्रसंख्याबळी ॥ त्वच्चारित्र्यमनोज्ञ नाकचरही त्वद्भक्तिसंपन्न मी । त्वद्भक्तामरराजया तव पदा त्वद्दास्यकामी नमीं ॥ ७२ ॥

॥ स्रग्धरा ॥

देवा आलास येथें यदुकुलरमणा सोडुनी गोकुलातें । जेव्हां तेव्हां च मींही प्रणत तप करूं चालिलों काननातें ॥ त्वत्संकल्पें विवाह श्रितजनशुभदा जाहला दीनबंधो । झालों स्वामी कुटुंबी तदुपरि कमलानाथ कारुण्यसिंधो ॥ ७३ ॥ भिक्षान्नें पोषिलें म्यां शिणुनि बहुपरीं बायकोलेंकरांतें । आरंभापासुनीयां परिस मुरहरा शक्य नोहे परातें ॥ झाला हा थोर धंदा अनुदिन मजला वाढला फारसा ही । आतां दैन्यव्यथा ही असह्य गमतसे सर्वथा मी न साहीं ॥ ७४ ॥

॥ मौक्तिकमाला ॥

चिरतरदैन्या भोगुनि कांता । बहुपरि झाली दुःखितचित्ता ॥ शिण तुज देवा हे कळवाया। मज वदली जा हें यदुराया ॥ ७५ ॥ बहु दिवसांचा दर्शनकामी । झडकरि आलों चिज्जनका मी ॥ श्रित-सुरवृक्षा सज्जनपक्षा । करि करुणेतें तामरसाक्षा ॥ ७६ ॥

## ॥ पद ॥ १३ ॥

॥ राग झुंझोटी ॥ आदिताळ ॥

॥ धाटी–गुजरगयो गुजरान० ॥

कवण गति मजलागिं ॥ कल्याण कृष्णा ॥ क० ॥ध्रु०॥ कष्ट सोसुं मीं हे किती कथि मला पति या जगतीं ॥ कमलाक्ष कल्याण कृष्णा ॥ १ ॥ लोकनाथ सांगूं शिणा तुजविण कोणा रम्यगुणा ॥ करुणाब्धिकल्पा० ॥ २ ॥ अमरसार्वभौमा हरि त्वदितर शौरि कोण करी ॥ निजभक्तकल्याण०॥३॥ रामचंद्रबंधो जनीं मज तुज वांचुनी प्राणधणी ॥ कृतदासकल्याण० ॥ ४ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ मंदाक्रांत ॥

खाया प्याया प्रियकर असें वस्त्र नेसावयाला । त्याया पोरें हट-कुनि मला मागती रे दयाळा ॥ पोटासाठीं खटपट सदां मांडितां तें भरेना । ऐशाठायीं वद यदुपते काय द्यावें कळेना ॥ ७७ ॥ वस्त्राभावें सतत ललना लेंकरें कष्टतात । शीताधिक्यें हुडहुड सुटे घोण ते घालितात ॥ आहे माझें परिस उघडें झोंपडें फाटकें-तें । केवां डोयीवरि बसल कीं यापरी चित्त भीतें ॥ ७८ ॥ दैन्यापेक्षां मरण बरवें भासतें मन्मनाला । इच्छा तूझी प्रबल कमलावल्लभा लोक-पाला ॥ देवा आम्हीं करुनि मनुजीं कोणता यत्न चाले । प्रारब्धाचे शिण दिन हरे भोगितां फार गेले ॥ ७९ ॥

## ॥ आर्या—गीति ॥

ज्येष्ठा आणि कनिष्ठा, या दोघीं मज तुज क्रमें वरिल्या ॥ यातें .कीं स्नेहातें, दादा म्हणसी स्मरोनि मजवरिल्या ॥ ४० ॥ दीनद-याळा माझी, केली त्वां श्रीपते सुचिर विसर ॥ म्हणसी उपेक्षिलें त्यां, यत्पदरज याचितात सुरविसर ॥ ४१ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ भुजंगप्रयात ॥

सुधासिंधुतीरीं क्षुधावंत जैसा । जसा कल्पवृक्षाश्रयीं दीन तैसा ॥ त्वदीयाश्रयीं मी शिणें सानुकंपा । करावी कृपा श्रीपते माय-बापा ॥ ८० ॥

## ॥ नोट ॥

गमपा मापा मापा मपागमरिसनीनो सग्गरिगामापा ॥ मगरिस रीग
सुकृपा बापा मापा क्षपाकरधरमित्रा संहृतसंतापा ॥ तुजविण कोण
मरो सससा ॥ पाध निसा निस रीगमपा ॥ मपगरिसरिगा मापा ॥
हरे रक्षिता ॥ पाव विभो झणि देशुभपा ॥ न कधिंहि करिगा मापा ॥
पाधा पस्सनिध निधपमपामागारी सा ॥ रीगामागरि ॥ १ ॥
पादा प्रणमिन वरगुणपारावारा ये ॥ विश्रामाश्रित ॥ १ ॥

॥ दिंडी ॥

वदुनि ऐसा तो मौन धरुनि राहे । काय बोले श्रीकृष्ण, असा पाहे ॥ तदा बोले त्या देव अगा दादा । काय चिंता तूं पावसी प्रमोदा ॥ ५ ॥ बरें वहिनीनें पाठविलें काय । आणिलें त्वां जें प्रिया होय देय ॥ तया पसरोनी हात देव मागे । तदा लाजूं तो विप्र फार लागे ॥ ६ ॥ राजराजाला तुला माधवाला । काय देऊं बा बापुडा कृपाळा ॥ असें बोलोनी विप्र मनीं खोंचे । पृथुक द्याया तैं करीं कृष्णजीचे ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥

॥ इंद्रवज्रा ॥

दादा न येसी सहसा रिकामा । भेटावया तूं मजला सुदामा ॥ त्वां आणिलें तें अपरूप कांहीं । कां ते दिसे दे निजहस्तकांहीं ॥ ८१ ॥

॥ मालिनी ॥

वदुनि यदुवरानें यापरी तस्करानें । पृथुक परमहर्षें घेतले आदरानें ॥ भरुनि मुठ फकेतें देउनी देव खातां । मटमट मिटक्या दे लोक सारे पाहतां ॥ ८२ ॥

॥ आर्या—गीति ॥

खातां मुठभर पोहे, अर्पी सिंहासनाधिपत्यातें ॥ भावी परम पदातें, स्वमनीं श्रीहरि महीसुरा त्यातें ॥ ४२ ॥ ( एथें प्रथम पदीं चरण तिसरा ॥ मुठभर पोहे ॥ मु० ॥ म्हणून नामसंकीर्तन केलें पाहिजे )॥ भरिली हरिनें दुसरी, मुष्टि तदा रुक्मिणी धरी तीतें ॥ वदली आदरिलें कां, आजि विभो या अपूर्वरीतीतें ॥ ४३ ॥

॥ गोपीगीत ॥

॥ शुद्धकामदा ॥

सकल हीं तुह्मां काय नायका । पृथुक हे विभो सौख्यदायका ॥ रुचिर जें गमे तें प्रियेप्रती । नचि दयानिधे काय अर्पिती ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥

॥ शार्दूलवि० ॥

ऐसी बोलुनि रुक्मिणी पृथुक ते घेवोनि अत्यादरें । वेगें आपण

खाय वांटुनि तदा राधादिकांतें करें ॥ खाती सर्व महत्प्रियेंकरुनियां तें गोड वाटे जना । श्रीश्रीकांतकराब्जयोग घडल्या जें लोष्ट कां साजना ॥ ८३ ॥ तेव्हां श्रीहरि बोलिला उशिर कां व्हावा वृथा भोजना । येतां तूं शिणलास केवळ पथीं दादा जगत्सज्जना ॥ आतां ऊठ ह्मणोनि हात धरुनी विप्रास अंतःपुरीं । नेवोनी कनकासनीं बसविलें सप्रेम नानापरी ॥ ८४ ॥

॥ आर्या—गीति ॥

वसुदेवनंदनानें, नाहविला चंदनादितैलानें ॥ तो विप्र प्रेमानें, निर्मल ऐशा सुखोष्णसलिलानें ॥ ४४ ॥ नवरत्नभूषणांहीं, करितो शृंगार दिव्यवसनांहीं ॥ तो भक्तवत्सल रमाकांत कुचेला उणें नसे कांहीं ॥ ४५ ॥

॥ पद ॥ १४ ॥

॥ धाटी—कमलनयन घनश्याम त०॥

मदनजनक शिणगार करी हो ॥ध्रु०॥ निजकरकमलें द्विजवर धरुनी ॥ गजवरदायक प्रेमभरें हो ॥१॥ भरजरीऐशा पीतपटातें ॥ नेसउनी हरि पांघरवी हो ॥ २ ॥ लेववि कुडक्या कंठ्या पदकें ॥ तोडे चांगट आणि मुद्या हो ॥ ३ ॥ रामचंद्र प्रभु केसरी गंध ॥ मृगमदतिलकहि लावितसे हो ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ स्रग्धरा ॥

रत्नाच्या ताटवाट्या कनकरचितसीं थोर पानें ठशांचीं । सौधीं त्या मांडिती हो मणिखचित असे पाट डोणे तसेची ॥ त्या पंक्ती-माजि देव द्विजसहित बसे वांछिती सर्व भोज्या । वाहे हो वास त्याचा घुमुघुमित मिळे काय तो देवराजा ॥ ८५ ॥ चटण्या कोशिंबिरींचे जिनस रुचिरसे मोजवेनांत कांहीं । शाकांचेही तसेची विधविध भुवनीं त्यांस तों साम्य नाहीं ॥ ठेंचे नानाविधांचे सरसतर कढी

सांडगेपापडांसीं। बोंडें द्राक्षीदह्यांचीं मधुरचि मवडे वांछिती आदरेंसीं ॥ ८६ ॥

॥ भुजंगप्रयात ॥

मऊमोकळें शुभ्रसें दिव्य अन्न। बरें वांढिती तूप वाट्या भरून ॥ तदा रुक्मिणी देत आपोशनातें। स्वहस्तें तया आणि हस्तोदकातें ॥ ८७ ॥

॥ दिंडी ॥

देव उपचारां करी सुदाम्याला । गड्या तुजलागीं उशिर फार झाला ॥ त्वरा नाहीं रे सुखें सावकाश । जेव संकोचा करूं नको लेश ॥ ८ ॥

॥ आर्या—गीति ॥

चित्रान्नभेद बहु ते, वाढवि ते आदरें वदोन सती ॥ तुकड्यांच ही तैसे, तितुके स्वर्गांतही कदा नसती ॥ ४६ ॥ मांडे फेण्या पोळया, सोमासे गुळवऱ्या असे तुकडे ॥ लाडाचे जिनस तसे, वाढिति किति ह्मणुनि खावती तिकडे ॥ ४७ ॥ वाढा वाढा ह्मणतां, हरि वरिवरि वाढिती यथेष्ट तदा ॥ वाहाति घृतदुग्धनद्या, विप्र ह्मणे रे पुरे पुरे हितदा ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥

॥ भुजंगप्र० ॥

खिरी वाढिल्या हो रवासेंवयांच्या। भरी रुक्मिणी पूर्ण वाट्या दह्यांच्या ॥ दिली तक्रही शर्करा पानकातें ॥ तया शेवटीं उत्तरापोशनातें ॥ ८८ ॥

॥ आर्या—गीति ॥

हरिपरिचारक लोकें, सुदाम उष्णोदकेंचि आंचविला ॥ ज्यान तपोधनाचा, व्रज तनुकोशांत सतत सांचविला ॥ ४९ ॥ भोजनतृप्तद्विजसह, आचमनातें करोनि कमलेश ॥ बसल्यावरि वदला द्विज, देवा नुरलाचि दीनतालेश ॥ ५० ॥

॥ पद ॥ १९ ॥

॥ राग झिंझोटी ॥ ताळबिलंदी ॥

॥ धाटी-नदिकिनार नदिकिनार० ॥

सुदिन आजि सुदिन आजि ॥ हरे सुरेशा ॥ध्रु०॥ त्वदितर विश्राम घडे त्रिभुवनांत कैसा ॥ मुदितहृदय होय फार मुनिमानसै-हंसा ॥ १ ॥ संदर्शनलाभ मला सारसाक्ष झाला ॥ सुंदरांग शिण हरला सर्व हृषीकेशा ॥ २ ॥ भाग्योदय हाचि भला भव्यचरण-कमला ॥ भोगिशयन अतिविमला पूरितभक्ताशा ॥ ३ ॥ रामचंद्र-गीतचरित राजरत्नवेषा ॥ कामजनक कलुषापह करुणामृतकोशा ॥४॥

॥ आर्या—गीति ॥

सादर हरिनें दिधली, चादर कर्पूरवीटिकेसहित ॥ मग कथिलें बाल्याचें, उभयांचें ही स्मरोनियां चरित ॥ ९१ ॥ सांदीपनर्षिसत्तम, गुरुकुलवासांत धाडिलें विपिना ॥ गुरुपत्नीनें आह्मां, आणाया इंधनांस निजसदना ॥९२॥ केला इंधनसंग्रह, दोघांनीं त्या फिरोनियां रानीं ॥ झाली सांजहि चुकली, वाट अह्मां घेरिलें वनचरांनीं ॥९३॥

॥ श्लोक ॥

॥ शार्दूलवि० ॥

आला पाउस थोरसा गडगडी आभाळ कीं फाटलें । गाढांधें भरल्या दिशा न कळती पाणी वनीं दाटलें ॥ कांटे दाट बळें पदास रुतती वाहोनि येवोनियां । वाटा तों समजेचनांत शिणलों अत्यंत धाकोनियां ॥ ८९ ॥

॥ मालिनी ॥

जडगिर बहु झालीं इंधनें मस्तकास । भिजुनि घनरसानें कंप आला तनूस ॥ हृदय धडधडी तें सिंहशार्दूलनादें । न सुचत तंव आह्मां यत्न लब्धप्रमादें ॥ ९० ॥

॥ दिंडी ॥

घरीं अमुची तें फार करी चिंता । गुरुवराची ते भीत मनीं

कांता ॥ सख्या आल्यावरि घरा देशिकांनीं ॥ पडे अमुचें हें वृत्त ठीक कानीं । ९ ॥ निघाले ते गुरु शिष्य सहित राणीं । हुड-किती आह्मां बहुत चुकुर रानीं ॥ नांव घेवोनी थोर हाक देती । दिवे घेवोनी दोन चार हातीं ॥ १० ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

परिसुनि तंव आह्मीं हाक दूरोनि त्यांची । निरखुनि करदीपा धांवलों रे तसेची ॥ सदय गुरु अह्मांतें देखतां हर्षुनीयां । कवळुनि करयुग्में ने घरा आपुलीया ॥ ९१ ॥

॥ पद ॥ १६ ॥

॥ राग आनंदभैरवी ॥ आदिताळ ॥

॥ धाटी-फार छळितो सुमशरम० ॥

काय वदवे श्रीगुरुकरुणा करिन तया नमना ॥ प० ॥ होय तोचि मज हितकर भुवनीं ॥ सोयरा सख्या सुखकर जिवलग ॥ अ० ॥ केवळ थोर मनें जयानें ॥ केलें धन्य जिणें देव तोचि वसुदेव देवकी हें वचन खरें ॥ हे प्रियतम अह ॥ १ ॥ जाड्यतमीं बहु शिणतां पहातां कळवळुनी दाता सत्पथ दावी ॥ संविन्मय जो दीप लाउनी दीन जनाप्रति ॥ २ ॥ या मज त्या विमलें दयाळें ॥ प्राणदान दिधलें ॥ मन्मन तनु हें मंदिर त्याचें ॥ रामचंद्र विभु राजसुखाब्जें ॥ ३ ॥

॥ आर्या—गीति ॥

जननीजनककरीं मग, आह्मां वोपोनि गुरु घरा जाय ॥ वृत्तांत शिशुपणाचा, सख्या तुला स्मरण हा असे काय ॥ ९४ ॥ वृत्त स्मरण असे हें, आणिकही एक ठाउकें मजला ॥ ध्यानीं तुझ्या नसे तरि, कृष्णा सांगेन ऐक रे तुजला ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥

॥ इंद्रवंशा ॥

कैंचा तुला श्रीगुरु तो जगद्गुरो । त्वन्मान्यतेनें भवसागरा तरो ॥ कोठें कृपा त्वद्धृदयाविना वसे । ब्रह्मादिवंद्या तुजवंद्य तो नसे ॥ ९६ ॥

॥ इंद्रवज्रा ॥

ध्यातां तुला धन्य जगांत होती । तूतें करूं धन्य न सुज्ञ चिंती ॥ माता पिता कोण तुझे स्वभूचे । देवाधिदेवा तुज देव कैंचे ॥ ९३ ॥

॥ भुजंगप्र० ॥

तुला चिद्घना जाड्य कैंचें कळेना । जगज्जीवना कोण दे प्राणदाना ॥ हरे हे तुझे खेळ नानापरींचे । मला ठाउके नेटके होय साचे ॥ ९४ ॥

॥ मालिनी ॥

गुरुवरकुलवासीं श्रीहरे वेदवंद्या । ग्रहण करुनि सारी तन्मुखें ब्रह्मविद्या ॥ मग झडकरि द्याया दक्षिणा लोकमान्या । स्वगुरुस पुसिला हा काम त्याचा वदान्या ॥ ९५ ॥

॥ शार्दूलवि० ॥

बोले साधु तदा हरे यदुपते हे दानवध्वंसका । माझा पुत्र धरोनि शंखदनुजें नेला जगत्पालका ॥ तो पापी वसतो सदा अभयदा देवा समुद्रीं निकें । त्यातें जिंकुनि पुत्र आणुनि मला द्यावा तुवां कौतुकें ॥ ९६ ॥

॥ दंडकवृत्त ॥

दितिसुतहृतपुत्र आणोनि दे दक्षिणा यापरी मागतां श्रीगुरूंनीं तुला ॥ मथुनि दनुजसूनु दाना दिलें त्वां तया हे दयासागरा श्रीवरा निस्तुला ॥ ९७ ॥

॥ भुजंगप्र० ॥

सुता देखतां अश्रुसंपूर्णनेत्रें । मुदालिंगिलें तापसें त्या पवित्रें ॥ सदारें तुला पूर्ण आशीर्वदोनी । मुका घे मुखीं लाउनी हात दोनी ॥ ९८ ॥

## ॥ पद ॥ १७ ॥

॥ धाटी-झूलत राधासंग गिरिधर झूल० ॥

काय न करिसी सांग कृष्णा, का० ॥ ध्रु० ॥ नेणाति विधि

वासव तव महिमा, करणी देखुनि दंग ॥ कृष्णा ॥ १ ॥ देवा तुझ्या मना मानल्या, क्षणामाजि भवभंग ॥ कृ० ॥ २ ॥ सृष्टिस्थितिलयकर्ता तूंची, अघटित घटविसि चांग ॥ कृ० ॥ ३ ॥ तव पदकमलीं सदैव झाला, रामचंद्र कवि भृंग ॥ कृ० ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ वसंतति० ॥

देवा तुझी परम अद्भुत होय लीला । सीमा नसे निरखितां भुवनांत जीला ॥ वाचामगोचर अशा विषया वदावें । कोणें किती ह्मणुनियां ह्रदयीं धरावें ॥ ९९ ॥

॥ स्रग्धरा ॥

बाल्याचे खेळ सारे स्मरुनि करिति ते सौख्यसंल्हाप दोघे । अन्योन्यातें तयांच्या निरखुनि जन तैं फारशा विस्मया घे ॥ एवंरीत्या द्विजें श्रीहरिसहित सुखें लोटिली रात्र सारी । प्रातःकाळीं उठोनी ह्मणत मज विभो दे नियोगा मुरारी ॥ १०० ॥

॥ भुजंगप्र० ॥

घरीं बायको लेंकरें कष्टताती । नसे मी तरी तेथ ते काय खाती ॥ तुझ्या दर्शनें धन्य झालों दयाळा । बऱ्या पावलों सर्व सौख्योदयाला ॥ १०१ ॥

॥ अभिनवतामरस ॥

बहुदिवसांवरि भेट दिली त्वां । परतसि कां सखया ह्मणि आतां ॥ मजजवळी वस निश्चलचित्तें । दशदिन दे तरि सौख्य मनातें ॥ १०२ ॥ परिसुनि यापरि विप्र ह्मणे रे । पुनरपि येइन शीघ्र मुरारे ॥ तव पददर्शन घेइन शौरे । मज ह्मणिअद्य नियोगचि दे रे ॥ १०३ ॥

॥ तोटक ॥

दिधली तरि जाय नियोग तुला । पुस रुक्मिणिला हरि हें वदला ॥ मग तो द्विज तीप्रति हें विनवी । वदलीन तिनें तंव गोष्ट नवी ॥ १०४ ॥

॥ भुजंगप्र० ॥

महाराज्ञि तूं तो रमा सर्वसुज्ञा । करोनी कृपा दे मला शीघ्र आज्ञा ॥ असें प्रार्थुनी पावला तन्नियोगा । पुन्हा कृष्णजीला पुसे विप्र कां गा ॥ १०५ ॥

॥ द्रुतवि० ॥

हरि ह्मणे पुनरागमनत्वरा । करि नको विसरूं मज भूसुरा ॥ कळविजे नमना वहिनीप्रति । तव मुलां मदनुग्रह सन्मति ॥१०६॥

॥ वसंतति० ॥

वाटेंत चोर फिरती करिती अपाया । प्राणासही निरखुनी धन सर्व न्याया ॥ याकारणें वसनभूषणसंचयातें । येथेंचि ठेउनि घरीं निजवाससातें ॥ १०७ ॥

॥ आर्या—गीति ॥

झाला थक्कित भूसुर, परिसुनि ऐशा रमेशवचनातें ॥ चिंताकुल तो तेव्हां, उतरवि मणिभूषणा हि वसनातें ॥ ५६ ॥ नेसुनि अपुली चिंधी, वंदी भगवत्पदांबुज द्विज तो ॥ ठेउनि सर्वाभरणें, वसनें कृष्णापुढें ह्मणे येतों ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥

॥ वंशस्थ ॥

बरें गड्या यापरि देव बोलिला । त्वरें सुदामा परतोनि चालिला ॥ मनीं ह्मणे श्रीहरिनेंचि वंचिलें । दिलें परी सर्व हिरोनि घेतलें ॥ १०८ ॥

॥ इंद्रवज्रा ॥

येथें रमानायक विश्वकर्मा । पाचारुनी सत्वरि मित्रशर्मा ॥ निर्मी वसे कीं जिकडे सुदामा । श्रीद्वारकातुल्य पुरी सुरामा ॥ १०९ ॥

॥ पद ॥ १८ ॥

॥ राग वेगवाहिनी ॥ आदिताळ ॥

॥ धाटी-चह्लगनातो बल्कुमि रामा ॥

काय वदान्य कृष्ण दयानिधि ॥ तोयजनाभ तो जलदाभ ॥प०॥

कांचननगरीं कल्पुनीवरी दीनकुचेला दिधला श्रीहरि ॥ अ० ॥ जगिं न दिसे हो ज्यासम अन्य सहज करी जो सामान्य मान्य ॥ कामितपूर्ति गजनुतकीर्ति रामचंद्रप्रभु राजन्य धन्य ॥ १ ॥ ( येथें प्रथम पदीं चरण पहिला ॥ हरि सुखदाता हरि दुरितातें ॥ ह्मणून नामसंकीर्तन केलें पाहिजे ॥ )

॥ श्लोक ॥

॥ शिखरिणी ॥

कुचेलानें जातां प्रथम निरखूं तार्क्ष्यगमना । कळे त्याच्या हर्षें पथिक शिण कांहीं च न मना ॥ पुन्हा गांवां येतां परत परम श्रांत थकला । विषादातें मानी द्विज कुमतिनें जेंवि ठकला ॥ ११० ॥ ह्मणे चित्तीं आहा मज यदुवरानें ठकविलें । त्यजावी आशा या मम विहितधर्मा शिकविलें ॥ वृथा खालीं झालों वचन वनितेचें परिसुनी ॥ सुखी होतों मागें अचलमति काम्या निरसुनी ॥ १११ ॥

॥ पद ॥ १९ ॥

॥ राग यमुनाकल्याणी ॥ ताळ विलंदी ॥

॥ धाटी-अहहा नैवजानें ॥ ध्रु० ॥

पहा हा काय झालें ॥ ध्रु० ॥ मंगळकर अत्युदार माधव मज भेटुनी हि न जाय कां दैन्य दैन्य दैन्य ॥ १ ॥ ठाउक मजलागिं फार ठक यदुपति जार चोर न सोडिली भ्रांत भ्रांत भ्रांत ॥ २ ॥ जाणत अपमान बहुत जोडितसे. धिग्जगांत निलाजिरा काम काम काम ॥ ३ ॥ कर्मभोग अपरिहार्य कळत करुनियां अकार्य दुखावलों राम राम राम ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ वसंततिलका ॥

आशे तुला परिस कांहिंच लाज नाहीं । तूं गाढवी ह्मणविसी नयविज्जनांहीं ॥ त्वत्तुल्यही करविसी भजल्या जनातें । सोडी मला झणि करी न समीप नातें ॥ ११२ ॥ आशे तुला नमन मी करितों करानें । आलें मला सख परे तव आदरानें ॥ आतां कृपा क-

ह्मनि थोर मनें त्वरा ही । जायीं सुखी खलमनोविपिनांत राहीं ॥११३॥ आधींच म्यां सकल हा सुविचार केला । तो मानला न सहसा मम नायिकेला ॥ योषाजनास बहु बाधित संपदाशा । त्या नायकावरि झुगारिति मोहपाशा ॥ ११४ ॥ वेडें क्षणांत करिती निजनायकाला । थोडें तरी नुमजतां श्रम देशकाला ॥ तें सर्वही समजतें अमुच्या मनाला । पुंसें कसें निरसवे वनिताजनाला ॥ ११५ ॥

॥ पद ॥ २० ॥

॥ राग शंकराभरण ॥ छापताळ ॥

॥ धाटी–येन्हेळलिहेंडतिकूडे ॥

कांतेप्रति काय वदावें ॥ प० ॥ आतां कसें सदनाप्रति जावें ॥ अ० ॥ पद्ममुद्रे मज निरखुनीं मुलगे ॥ कर पसरिति त्यां काय द्यावें ॥१॥ सरसिजनाभें सुख दिधलें तें ॥ स्वप्नीं दिसल्यासम समजावें ॥२॥ सोडूनि लज्जा सर्वजनाला ॥ तोंड कसें म्यां दावावें ॥३॥ रामचंद्रप्रभुराजकृतीचें ॥ विस्मय कैसे विसरावे ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥

॥ वसंततिलका ॥

ऐशापरी करित चिंतन विप्र चाले । त्याला पुन्हा शकुन उत्तम फार झाले ॥ पाहोनि त्या अतिउदास मनांत वानी । हे कासयास दिधले फल काय यांनीं ॥ ११६ ॥

॥ मालिनी ॥

शकुन बहुत झाले द्वारकेलागिं जातां । अशन सरस तेणें लाभलें ही पहातां ॥ पुनरपि मज होती हेतु यांचा कळेना । स्वपरसदनि तैसें जेवणें तों मिळेना ॥ ११७ ॥

॥ आर्या—गीति ॥

ऐसें चिंतित जातां, पाहे नवरत्नखचित गोपुर तें ॥ गमलें कैलासाचें, वैकुंठाचेंचि कायसें पुर तें ॥ ९८ ॥ मानी मनांत चुकली, वाट पहा मांडला महा खेद ॥ आलों पुन्हा फिरोनि मी, हरिनगराला ह्मणे धरादेव ॥ ९९ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ भुजंगप्रयात ॥

खरी द्वारका ही गमे निश्चयानें । फिरावें पुन्हा शीघ्र आतांचि मानें ॥ पुरे एकदां पावली ते अवज्ञा । न माने पुन्हा गुंतणें हें नयज्ञा ॥ ११८ ॥ पहा चालिली आजि तो व्यर्थ वाट । क्रमावी पुन्हा म्या कसी ही अचाट ॥ धनाचे भ्रमीं घातिलें कष्टकालें । हरे कृष्ण म्या काय रे पाप केलें ॥ ११९ ॥

## ॥ गोपीगीत ॥

॥ शुद्धकामदा ॥

करित तो असी विप्र चिंतना । परम भासली पादवेदना ॥ म्हणुनि बैसला श्रांत त्या वनीं । क्षण विसंबला तो तपोधनी ॥ ६ ॥ निरखिल्या जशा द्वारकावनीं । तरूलता तशा भासती मनीं ॥ विहिरही नद्या तैं सरोवर । विहगजातिही पादपांवर ॥ ७ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ शिखरिणी ॥

सुदाम्याचे मंत्री हुडकित निघाले क्षणि तदा । धण्यातें घेवोनी सकल पृतना वाद्यबिरदा ॥ शिले झाले स्वाऱ्या सहित मग उद्यान विपिनीं ॥ कुचेलातें येतां निरखिति गमे अद्भुत मनीं ॥ १२० ॥

॥ शार्दूलवि० ॥

ठेले येउनि ते समग्र विनयें सामोर तैं भूसुरा ॥ साष्टांग प्रणिपात घालुनि पदीं जोडोनि शीर्षी करा ॥ तुह्मीं कोण असें तयांस पुसिलें विप्रें महातापसें । स्वामी दास असों स्वकीय ह्मणती हा बोलिला तें कसें ॥ १२१ ॥

## ॥ दिंडी ॥

मला कैंचे रे दास दरिद्रास । करुनि चेरे कां लावितसां त्रास ॥ असे परिसोनी बोल सुदाम्याचे । सचिव झाले हो फार ते मनाचे ॥ ११ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ भुजंगप्रयात ॥

महाराज जी आपुल्या कृष्णजींनीं । पुरी निर्मिली विश्वकर्म्याकडोनी ॥ दिली द्वारकेसारिखी आपणाला । असे निश्चयें स्वर्णरत्नानुकूला ॥ १२२ ॥

॥ वसंततिलका ॥

आह्मीं विभो सचिव ही चतुरंग सेना । स्वामीविना स्वनगरांत उगे बसूंना ॥ आलों ययास्तव क्षणी निजसन्निधाना । येईं विभो सुखविजे स्वपुरा प्रधाना ॥ १२३ ॥

॥ मालिनी ॥

विनवुनि सचिवांनीं यापरी त्या धण्याला ॥ नृपवरवसनांहीं तैं अलंकार केला ॥ कटकमकुटमुक्ताहारवारादिकांहीं । प्रथमहरिकृता या भासना भेद कांहीं ॥ १२४ ॥

॥ शार्दूलवि० ॥

योजी विप्र मनीं तदा प्रथम तो कृष्णें अलंकारुनी । नानारत्नविभूषणें मग मला वेडेंचि केलें जनीं ॥ आहे केवळ जें असत्य हरिचेठायीं जगन्नायकीं ॥ आतां हे शिणगार फार करिती आलें पुन्हा काय कीं ॥ १२५ ॥

॥ इंद्रवज्रा ॥

यावें महाराज ह्मणोनि त्यातें ॥ दोहींकडेही करलाघवातें ॥ देवोनियां ते शिबिकेंत हातें ॥ हळूहळू बैसविति द्विजातें ॥ १२६ ॥

## ॥ आर्या—गीति ॥

मग जयजयशब्दांहीं, स्तवित मुखें भाट गर्जती सारे ॥ स्वारी सुदामजीची, निघतां तो ह्मणत पाहि कंसारे ॥ ६० ॥

## पद ॥ २१ ॥

॥ राग धनासरी ॥ ताळ त्रिळंदी ॥

श्रीपतिसख येत विप्र सपरिवार नगरा श्रीप० ॥ ध्रु० ॥ होत

विविध वाद्यगजर घालुनियां घेरा ॥ घेउनि रथकुंजराश्व पादचार वारा ॥ १ ॥ ध्वजपताक सूर्य चंद्र तोरणादिनिकरा ॥ धरूनि पुढें धांवतसे सैनिकजनधारा ॥ २ ॥ वारिताति चामरादि ठोकिती नगारा ॥ स्तवित मुखें सरस रामचंद्रविभु उदारा ॥ ३ ॥

॥ आर्या—गीति ॥

येतां सुदाम पाहे, पुररचनेच्या समस्त चातुर्या ॥ मागत होता मागें, अर्थातें जो रमेश्वरा तुर्या ॥ ६१ ॥ प्राकारगोपुरातें, जों निरखी विप्र भासले याला ॥ ही द्वारकाच गमते, हुडकावा मार्ग म्यां पळायाला ॥ ६२ ॥ सालद्वारीं शिरतां, स्वारी बहु तोफ वाजले वरते ॥ चिंती द्विज म्यां आतां, काय पळाल्या बळी न आवरते ॥ ६३ ॥

॥ दिंडी ॥

राजवीथी त्या फार शोभताती ॥ द्वारकेच्या या असें भासताती ॥ ह्मणे मज तो हरि कासयास नेतो ॥ पळाल्याही म्यां देव सोडिना तो ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥

॥ मालिनी ॥

जयजयजयशब्दें त्यास अंतःपुरास । झडकरि सचिवांनीं आणिलें भुसूरास ॥ मग उतरविती त्या दिव्य आंदोलिकेतें । स्तवुनि मुनिवराही देउनीयां करातें ॥ १२७ ॥

॥ शार्दूलविक्रीडित ॥

आली भूसुरकामिनी निजकरीं घेवोनियां आरती । वोवाळूं पतिलागिं ते विलसली अत्यंत जैसी रति ॥ ल्याली कांचनरत्नभूषणगणा दिव्यांबरा सुंदरी । तीतें देखुनि विप्र तो ह्मणतसे ही कोण हे अंतरीं ॥ १२८ ॥ वोवाळोनि पतिप्रती ह्मणतसे जाणोनि त्याचे मना । कांता काय निजप्रिया विसरलां येतां फला कामना ॥ ऐसें अप्रतिमेय वैभव तुह्मां श्रीकृष्णनाथें दिलें । बाल्याचा अपुला सखा ह्मणवनी प्रेमेंचि उद्धारिलें ॥ १२९ ॥

## ॥ पद २२ ॥

॥ राग तोडी ॥ आदिताल ॥

॥ धाटी—केरळराजकृतींत ॥ साधु तदा निज भामिनी ॥

सावध व्हा मम वल्लभा ॥ सदय सुरेश्वरसन्निभा साव० ॥ ध्रु० ॥ तावकीच मी दयिता समजा ॥ या वचना बरवें भजा ॥१॥ लेंकरें खरीं आपुलींच पहा ॥ लगबग येति मुदें महा ॥ २ ॥ सौध साजतो आपुली सभा ॥ कांचनरत्नमहत्प्रभा ॥ ३ ॥ रामचंद्र विभु करुणासुलभा ॥ वरानृपासन भाग्यभा ॥ ४ ॥

॥ आर्या—गीति ॥

परिसुनि कांतावचना, झाला तो विप्र सावधानमना ॥ समजुनि हरिची करुणा, स्मरोनि तच्चरण, करितसे नमना ॥ ६४ ॥ पश्चात्तापें केवळ, झळंबला विप्र तो मनामाजी ॥ वाचे वदत सुभावें, मुरहरहरि विष्णु कृष्ण नाना जी ॥६५॥ संपादिलों ह्मणे तो, अन्यायें ईश्वरापराधा मी ॥ दूषण करोनि अहहा, काय असे विभव माझिया धामीं ॥६६॥

॥ श्लोक ॥

॥ भुजंगप्रयात ॥

अनंतापराधी असें मी दयाळा । क्षमावें तुवां श्रीपते लोकपाळा ॥ हरे तूंचि रे भक्तकल्याणकर्ता । तुवां अर्पिलें भाग्य तापत्रयार्ता ॥ १३० ॥ न जाणे तुझ्या मी शरण्या पदान्या । कृपावीक्षणें पाहि देवा वदान्या ॥ तुवां अर्पिलें सर्व साम्राज्य मातें । अरे श्रीपते श्रीहरे अक्षमातें ॥ १३१ ॥

## ॥ पद ॥ २३ ॥

॥ राग मध्यमावती ॥ आदिताळ ॥

काय कृपालु हरि कमलापति का० ॥ ध्रु० ॥ श्रीयदुराय श्रित जनसदय ॥ तोयदकाय तो दनुजारि ॥ १ ॥ मकरमुखाहुनी मतंगज पाही ॥ चुकवि करांहीं सद्गुण शौरि ॥ २ ॥ वृष्टींत मंदर उचलुनि सुंदर ॥ रक्षी मुरहर गोधन भारी ॥ ३ ॥ ब्राह्मण दीन बैसविला झणिं ॥ रामचंद्रप्रभु राजपदावरी ॥ ४ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ इंद्रवज्रा ॥

गालावरी ताडुनि घेत हस्तें । मागे क्षमा क्षमासुर भीतचित्तें ॥ स्थापोनियां द्वद्भवनांत कृष्णा । पूजी सदा पूरितलोकतृष्णा ॥ १२ ॥

॥ शिखरिणी ॥

पिता माता हाणी सुहृद बहुधा दूष्य वदती । प्रिया हातें प्रेमें कवळिति मुनि ध्यान करिती ॥ प्रणामातें भावें प्रणत करिती पूजिति जया । तयां सर्वां हर्षे सुरतिलक दे कृष्ण अभया ॥ १३३ ॥

॥ वसंतति० ॥

श्रीमत्सुदाम नृप तो सचिवादिकांनीं । सिंहासनीं बसविला मग सेवकांनीं ॥ सानंद नांदत सुखें करि राज्यभारा । जो लाजवी स्वविभवातिशयें कुबेरा ॥ १३४ ॥

## ॥ आर्या—गीति ॥

अत्यंत प्रेमानें, दाशरथीसाच तो प्रजा पाळी ॥ निरखुनि नीति जयाची, धरिली लज्जा मनांत भूपाळीं ॥ ६७ ॥ जिकडे कृष्णप्रेमा, नर्तन तिकडे सदैव करिते मा ॥ झाला पहा सुदामा, परिवर्तुनियां कुचेल निजनामा ॥ ६८ ॥

## पद ॥ २४ ॥

॥ राग बिभास ॥ आदिताल ॥

भाग्यप्रभाकरोदय झाला ॥ ध्रु० ॥ भार्यासुतादिकमुखकमला ॥ आली कला नटली कमला ॥ १ ॥ दैन्यदिवांधवृंद पळाला ॥ दुःखांधकार मावळला ॥ २ ॥ चिंताचोरनिवह दडाला ॥ सुखचक्रवार नांदतसे भला ॥ ३ ॥ रामचंद्र प्रभुप्रसादें ॥ मांडला कामपूर्तीचा विविध सोहळा ॥ ४ ॥

## ॥ श्लोक ॥

॥ शार्दूलविक्रीडित ॥

ऐसी ही कथिली बरी हरिकथा व्यासात्मजांनीं पुरा । ती ऐको-

नि परिक्षितिक्षितिवरा आनंद झाला बरा ॥ ध्यानीं सुंदर कृष्णमूर्ति धरूनी जोडोनि दोहीं करां ॥ वंदी भूपति शुद्धभाव धरूनी योगीश्वरा श्रीधरा ॥ १३५ ॥

॥ वंशस्थ ॥

सुदामभाग्योदय यांत वर्णिला ॥ ह्मणोनि अन्वर्थक सिद्ध जाहला ॥ रचोनि हा ग्रंथ मुदें समर्पिला ॥ सभक्ति कृष्णार्पणबुद्धिनें भला ॥ १३६ ॥

॥ शार्दूलविक्रीडित ॥

श्रीमद्भागवता सुदामचरिता कर्णामृता तत्वता । भावें जे लिहिती मुदेंचि पठती आनंदती ऐकतां ॥ स्वप्नींही सहसा तयांस न घडे दारिद्र्यबाधा जनीं । सर्वाभीष्टहि रामचंद्र विभु तो देतो मनीं हर्षुनीं ॥ १३७ ॥ प्रथम पद ह्मणून नामसंकीर्तन करणें ॥ ॥

## ॥ श्रीमत्सुदामभाग्योदयः संपूर्णः ॥

